**चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यामध्ये रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी चांदा ते बांदा या योजनेअंतर्गत राज्य स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष आणि चंद्रपूर व सिंधुदूर्ग या जिल्हयांसाठी जिल्हा स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष पदनिर्मीतीसह निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय, क्र. डिएपी- १०१६/ प्र.क्र. १८६/ का. १४८१,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई. -४०० ०३२.
दिनांक : १८ नोव्हेंबर , २०१६

<u>वाचा</u> : (१) शासन निर्णय, नियोजन विभाग, डिएपी- १०१५/ प्र.क्र. ५१/का. १४८१, दि २० .ऑगस्ट, २०१५.
(२) शासन निर्णय, नियोजन विभाग, डिएपी- १०१५/ प्र.क्र. ५१/ का. १४८१, १९ डिसेंबर,२०१५
(३) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. डिएपी- १०१५/ प्र.क्र. ५१/ का. १४८१, दि. २९ जून,२०१६.
(४) शासन ज्ञापन, नियोजन विभाग, क्र. डिएपी-१०१६/ प्र.क्र. १८६/ का. १४८१, दि. १६ सप्टेंबर, २०१६

**प्रस्तावना -:**

राज्याच्या सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पिय भाषणामध्ये “महाराष्ट्राच्या दोन टोकावरील चंद्रपूर व सिंधुदुर्ग हे खनिज व नैसर्गिक संपत्तीचे वरदान लाभलेले जिल्हे आहेत. या जिल्हयांतील नैसर्गिक साधनसंपत्तीचा इष्टतम वापर व्हावा यासाठी सधन नियोजन व अंमलबजावणीचा विशेष कार्यक्रम राबविण्यात येईल” अशी घोषणा करण्यात आली होती.

२. वरील घोषणेस अनुसरुन राज्य शासनाने चंद्रपूर व सिंधुदूर्ग या दोन जिल्ह्यांची निवड सूक्ष्म नियोजन व अंमलबजावणीसाठी केली आहे .

३. संदर्भाधीन अ. क्र. (३) येथील दि. २९/६/२०१६ च्या शासन निर्णयान्वये चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांमध्ये रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट हा पथदर्शी कार्यक्रम राबविण्यासाठी चांदा ते बांदा योजनेस शासनाची मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १३ ला अनुसरून या कार्यक्रमा अंतर्गत “राज्य स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष” व दोन्ही जिल्हयात “जिल्हा स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष” पद निर्मीतीसह स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यांमध्ये रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट हा कार्यक्रम राबविण्यासाठी चांदा ते बांदा या योजनेअंतर्गत पुढील तक्त्यांमध्ये दर्शविल्यानुसार नवीन पद निर्मितीसह “राज्य स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष” आणि चंद्रपूर व सिंधुदूर्ग या जिल्ह्यांसाठी “जिल्हा स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष” स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

## राज्य स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्ष

| अ.क्र. | पद | एकूण पदे | दर्जा | अनुभव | वेतनश्रेणी/ कमाल मासिक एकत्रित मानधन | निवड प्रकिया |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | प्रकल्प संचालक | १ | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/ उपायुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय/ मंत्रालयीन उप सचिव (गट- अ) | किमान १५ वर्षे शासकीय सेवा. अशा प्रकारचे प्रकल्प हाताळण्याचा ५ वर्षांचा अनुभव | रु. १५६००-३९१०० ग्रेड वेतन ६६००/७६०० | प्रतिनियुक्ती |
| २ | प्रकल्प व्यवस्थापक (मूल्यमापन) | १ | महाराष्ट्र विकास सेवा/ अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील (गट-अ) चे अधिकारी | किमान १० वर्षे शासकीय सेवा. अशा प्रकारचे प्रकल्प हाताळण्याचा ३ वर्षांचा अनुभव | रु. १५६००-३९१०० ग्रेड वेतन ५४००/६६०० | प्रतिनियुक्ती |
| ३ | प्रकल्प व्यवस्थापक | २ | Professional from Open Market | किमान १० वर्षे अनुभव. अशा प्रकारचे प्रकल्प हाताळण्याचा ३ वर्षांचा अनुभव | रु. ७७,००० प्रत्येकी | बाहय यंत्रणेकडून आऊट सोर्स्ड |
| ४ | युवा व्यवसायिक | २ | -- | ३ वर्षांचा अनुभव | रु. ५५,००० प्रत्येकी | बाहय यंत्रणेकडून आऊट सोर्स्ड |
| ५ | कार्यालयीन सहाय्यक | ३ | -- | किमान २ वर्षाचा अनुभव | रु. १८,३०० प्रत्येकी | बाहय यंत्रणेकडून आऊट सोर्स्ड |
| एकूण पदे | | ९ | | | | |

## जिल्हा प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (प्रति जिल्हा)

| अ.क्र. | पद | एकूण पदे | दर्जा | अनुभव | वेतनश्रेणी/ कमाल मासिक एकत्रित मानधन | निवड प्रक्रिया |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | जिल्हा समन्वयक | १ | महाराष्ट्र विकास सेवा (म.वि.से.)/अर्थ व सांख्यिकी संचालनालय/ महसूल विभागातील उपजिल्हाधिकारी/ तहसिलदार गट-अ चे अधिकारी | किमान १० वर्षे शासकीय सेवा | रु. १५६००-३९१०० ग्रेड वेतन ५४००/६६०० | प्रतिनियुक्ती |
| २ | समन्वयक (मल्यमापन) | १ | महाराष्ट्र विकास सेवा (म.वि.से.) /अर्थ सांख्यिकी विभागातील गट-ब चे अधिकारी | किमान ५ ते ७ वर्षे | रु. ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४०० | प्रतिनियुक्ती |
| ३ | समन्वयक | २ | खाजगी व्यावसायीक (Professional) | किमान ५ ते ७ वर्षे | रु. ५०,००० प्रत्येकी | बाहय यंत्रणेकडून आऊट सोर्स्ड |
| ४ | युवा व्यावसायिक | १ | -- | किमान ३ वर्षे | रु. ३३,००० प्रत्येकी | बाहय यंत्रणेकडून आऊट सोर्स्ड |
| ५ | कार्यालयीन सहाय्यक | २ | -- | किमान २ वर्षे | रु. ८,००० प्रत्येकी | बाहय यंत्रणेकडून आऊट सोर्स्ड |
| एकूण पदे | | ७ | | | | |

वरील तक्त्यांमध्ये दर्शविल्यानुसार राज्य स्तरीय व्यवस्थापन कक्षासाठी ९ आणि चंद्रपूर व सिंधुदूर्ग जिल्ह्यांच्या प्रकल्प व्यवस्थापन कक्षासाठी प्रत्येकी ७ याप्रमाणे एकूण १४ अशी एकूण २३ पदे तात्पुरत्या स्वरूपात २ वर्षांच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास शासन मान्यता देत आहे. तसेच प्रकल्पाशी संबंधित व्यवस्थापन कक्षांसाठी ६ पदे प्रतिनियुक्तीने भरण्यात यावीत व उर्वरीत १७ पदे बाहय यंत्रणेकडून भरण्यात यावीत. या पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या तसेच, बाह्य यंत्रणेकडून भरण्यात येणाऱ्या पदांकरिता व्यक्तींची शैक्षणिक अर्हता या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “अ” मध्ये नमूद केली आहेत. त्याचप्रमाणे, बाह्य यंत्रणेकडून भरण्यात येणाऱ्या पदांकरिता देय भत्त्यांबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. उपरोक्त दोन्ही कक्षातील प्रतिनियुक्तीवरील पदांवरील व्यक्तींच्या नियुक्तीसाठी आवश्यक ती कार्यवाही नियोजन विभाग, आस्थापना शाखेमार्फत करण्यात येईल.

३. या योजने अंतर्गत राज्य स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्षासाठी उप सचिव (आस्थापना) , नियोजन विभाग हे “नियंत्रक अधिकारी” असतील व कक्ष अधिकारी, रोख शाखा, नियोजन विभाग हे “आहरण व संवितरण अधिकारी” असतील. तसेच जिल्हा स्तरीय व्यवस्थापन कक्षाकरितां सहायक जिल्हा नियोजन अधिकारी हे “आहरण व संवितरण अधिकारी” असतील. तसेच जिल्ह्याचे जिल्हा नियोजन अधिकारी हे “नियंत्रक अधिकारी” असतील.

४. या योजनेसाठी होणारा खर्च मागणी क्र. ओ- ७, लेखाशिर्ष “३४५१- सचिवालय आर्थिक सेवा, ००,०९०- सचिवालय, (०५) चांदा ते बांदा विशेष कार्यक्रम, (०५) (०१) चंद्रपूर व सिंधुदूर्ग या जिल्हयांमध्ये रिसोर्स बेस्ड इंटेसिव्ह प्लॅनिंग व डेव्हलपमेंट कार्यक्रम राबविणे.(३४५१ A०१९)” याखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने (अनौ. सं. क्र.२९६ / विसु-१ दि. ०३.०९.२०१६) निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०१६१११८१६५८२१२७१६ असा आहे. तसेच हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Netra Prashant Mankame

Digitally signed by Netra Prashant Mankame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19e4a6ac471ded0614da7ea31c20099ea471d8436dcf49faa3c0b2e0638732c3, cn=Netra Prashant Mankame
Date: 2016.11.19 16:51:18 +05'30'

**( ने. प्र. मानकामे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव ,
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
४) सर्व मा. मंत्री आणि राज्यमंत्री,
५) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७) मा. मुख्य सचिव,
८) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सिंधुदूर्ग व चंद्रपूर
११) मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, सिंधुदूर्ग व चंद्रपूर
१२) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, चंद्रपूर व सिंधुदूर्ग.
१३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रशासकीय इमारत, ८ वा मजला, वांद्रे पूर्व, मुंबई-४०० ०५१
१४) उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, कोकण विभाग व नागपूर विभाग.
१५) महालेखापाल, महाराष्ट्र १ व २ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), मुंबई व नागपूर.
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर व सिंधुदूर्ग.
१७) सर्व सह सचिव / उप सचिव,अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई. ३२.
१८) निवड नस्ती, का. १४८१.

## परिशिष्ट "अ"

राज्य स्तरीय व चंद्रपूर आणि सिंधुदुर्ग जिल्ह्याच्या जिल्हा स्तरीय प्रकल्प व्यवस्थापन कक्षातील पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या तसेच, दोन्ही कक्षातील बाह्य यंत्रणेकडून भरण्यात येणाऱ्या पदांकरिता व्यक्तींची शैक्षणिक अर्हता पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे आहे:-

### राज्य स्तरीय व्यवस्थापन कक्ष

| अ.क्र. | पद | बाह्य यंत्रणेकडून भरण्यात येणाऱ्या पदांकरिता शैक्षणिक अर्हता | कर्तव्ये व जबाबदाऱ्या |
|---|---|---|---|
| १ | प्रकल्प संचालक (प्रतिनियुक्ती) | -- | १) प्रकल्पाचे राज्य स्तरावरुन कार्यान्वियन करणे.<br>२) विविध प्रशासकीय विभाग व जिल्हाधिकारी कार्यालय यांच्याशी समन्वय साधणे .<br>३) कार्यक्रमाचा वार्षिक कृती आराखडा तयार करणे.<br>४) कार्यक्रमाची सुयोग्य अंमलबजावणी करणे.<br>५) कार्यक्रमाचा यशस्वितेकरिता योग्य ती कार्यप्रणाली विकसित करणे .<br>६) कार्यक्रमाचा प्रगतीचा आढावा घेणे तसेच संनियंत्रण व मुल्यमापन करणे .<br>७) विविध संस्थाशी भागीदारी करणे .<br>८) राज्य स्तरीय समितीचे अध्यक्ष तथा मा. राज्यमंत्री, (नियोजन) यांना तसेच अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांना रिपोर्टींग करणे.<br>९) राज्यात दौरा करुन कार्यक्रम अंमलबजावणीची प्रत्यक्ष पहाणी करणे.<br>१०) विविध stakeholders करिता क्षमता बांधणी प्रशिक्षण आयोजित करणे . |
| २ | प्रकल्प व्यवस्थापक (मूल्यमापन) (प्रतिनियुक्ती) | -- | १) प्रकल्प संचालक यांना कार्यक्रम अंमलबजावणीमध्ये सहाय्य करणे.<br>२) अंमलबजावणी यंत्रणा तसेच जिल्हा व्यवस्थापन कक्षास तांत्रिक सहाय्य उपलब्ध करुन देणे.<br>३) कार्यक्रमाचे यशस्वितेकरिता विविध stakeholders सोबत समन्वय राखणे.<br>४) कार्यक्रमाचे संनियंत्रण व मूल्यमापनाचे Indicators निश्चित करणे .<br>५) MIS प्रणाली विकसित करणे.<br>६) कार्यक्रमाचे योग्य मूल्यमापन करण्याच्या दृष्टीने दौरे करणे.<br>७) दरमहा कार्यक्रम अंमलबजावणीबाबत अहवाल तयार करुन सादर करणे.<br>८) प्रकल्प संचालकांनी वेळोवेळी दिलेल्या जबाबदाऱ्या पार पाडणे. |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | प्रकल्प व्यवस्थापक | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्य व्यवसाय विकास, पर्यटन, पर्यावरण इ. विषयातील पदव्युत्तर पदवी, एम.बी.ए., एम.एस.डब्ल्यु, तत्सम पदवी | १) प्रकल्प संचालक यांना कार्यक्रम अंमलबजावणीमध्ये सहाय्य करणे.<br>२) योजनेच्या वार्षिक कृती आराखडा तयार करण्यास जिल्हयांना साहाय्य करणे .<br>३) अंमलबजावणी यंत्रणा तसेच जिल्हा व्यवस्थापन कक्षास तांत्रिक सहाय्य उपलब्ध करुन देणे.<br>४) शेतकरी गट, महिला बचत गट यांच्या उपजिवीका बळकट करण्याच्या दृष्टीने कृषी, पशुपालन, मत्स्य व्यवसाय, क्लस्टर डेव्हलपमेंट इत्यादीबाबत मार्गदर्शन करणे व प्रशिक्षण आयोजित करणे.<br>५) शेतमालावर प्रक्रिया करुन त्यांना बाजारपेठ उपलब्ध करुन देण्याबाबत मार्गदर्शन करणे .<br>६) भागीदारी केलेल्या संस्थांबरोबर योग्य समन्वय राखणे तसेच त्यांच्या कामाचे वेळोवेळी मुल्यमापन करणे<br>७) कार्यक्रमाचे यशस्विततेकरिता विविध stakeholders सोबत समन्वय राखणे तसेच क्षमता बांधणी प्रशिक्षणे घेणे .<br>८) कार्यक्रमाची योग्य अंमलबजावणी व अपेक्षित परिणाम साध्य करण्याच्यादृष्टीने दौरे करणे .<br>९) प्रकल्प संचालकांनी वेळोवेळी दिलेल्या जबाबदाऱ्या पार पाडणे . |
| ४ | युवा व्यावसायिक | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्य व्यवसाय विकास, पर्यटन, पर्यावरण इ. विषयातील पदव्युत्तर पदवी, एम.बी.ए., एम.एस.डब्ल्यु, तत्सम पदवी किंवा आय. टी. किंवा मास मिडीया, आय. टी. मधील पद्व्युत्तर, तत्सम पदवी. | १) प्रकल्प संचालक तसेच प्रकल्प व्यवस्थापक यांना कार्यक्रम अंमलबजावणीकरिता सहाय्य करणे.<br>२) कार्यक्रमाची प्रचार प्रसिध्दी करणे.<br>३) विविध प्रसारमाध्यमांमार्फत जनतेपर्यत कार्यक्रमाची फलनिष्पती पोहचविणे.<br>४) कार्यक्रमाच्या यशोगाथा तसेच माहितीपुस्तिका तयार करणे.<br>५) नेमून दिलेल्या जिल्हयांमध्ये दौरे करणे.<br>६) प्रकल्प संचालकांनी वेळोवेळी दिलेल्या जबाबदाऱ्या पार पाडणे. |
| ५ | कार्यालयीन सहाय्यक | एच.एस.सी. व मराठी व इंग्रजी टंकलेखनाची विहित अर्हता. | १) कार्यक्रमाशी संबंधित पत्रव्यवहार टंकलिखित करणे.<br>२) कार्यक्रमाशी संबंधित सर्व कागदपत्रे सुस्थितीत जतन करणे.<br>३) प्रकल्प संचालक तसेच प्रकल्प व्यवस्थापक यांना सहाय्य करणे. |

जिल्हा प्रकल्प व्यवस्थापन कक्ष

| अ.क्र. | पद | बाह्य यंत्रणेकडून भरण्यात येणाऱ्या पदांकरिता शैक्षणिक अर्हता | कर्तव्ये व जबाबदाऱ्या |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा समन्वयक (प्रतिनियुक्ती) | -- | १) जिल्हा स्तरावर कार्यक्रमाचे कार्यान्वयन करणे.<br>२) कार्यान्वयन यंत्रणा तसेच जिल्हाधिकारी कार्यालय यांच्याशी समन्वय साधणे.<br>३) कार्यक्रमाचा जिल्हा वार्षिक कृती आराखडा तयार करणे.<br>४) कार्यक्रमाची सुयोग्य अंमलबजावणी करणे.<br>५) कार्यक्रमाचा यशस्वितेकरिता योग्य ती कार्यप्रणाली विकसित करणे .<br>६) कार्यक्रमाचा प्रगतीचा आढावा घेणे तसेच संनियंत्रण व मुल्यमापन करणे .<br>७) जिल्हाधिकारी यांना रिर्पोटींग करणे.<br>८) जिल्हयात दौरा करुन कार्यक्रम अंमलबजावणीची प्रत्यक्ष पहाणी करणे.<br>९) विविध stakeholders करिता क्षमता बांधणी प्रशिक्षण आयोजित करणे. |
| २ | समन्वयक (मूल्यमापन) (प्रतिनियुक्ती) | -- | १) जिल्हा समन्वयक यांना कार्यक्रम अंमलबजावणीमध्ये सहाय्य करणे.<br>२) अंमलबजावणी यंत्रणांना तांत्रिक सहाय्य उपलब्ध करुन देणे.<br>३) कार्यक्रमाचे यशस्वितेकरिता विविध stakeholders सोबत समन्वय राखणे तसेच क्षमता बांधणी प्रशिक्षण देणे .<br>४) दरमहा कार्यक्रम अंमलबजावणीबाबत अहवाल तयार करुन सादर करणे.<br>५) कार्यक्रमाचे योग्य मुल्यमापन करण्याच्या दृष्टीने दौरे करणे.<br>६) जिल्हा समन्वयकांनी वेळोवेळी दिलेल्या जबाबदाऱ्या पार पाडणे. |
| ३ | समन्वयक | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्य व्यवसाय विकास, पर्यटन, पर्यावरण इ. विषयातील पदव्युत्तर पदवी, एम.बी.ए., एम.एस.डब्ल्यु, तत्सम पदवी | १) जिल्हा समन्वयक यांना कार्यक्रम अंमलबजावणीमध्ये सहाय्य करणे.<br>२) शेतकरी गट, महिला बचत गट यांच्या उपजिवीका बळकट करण्याच्या दृष्टीने कृषी, पशुपालन, मत्स्यव्यवसाय, क्लस्टर डेव्हलपमेंट इत्यादीबाबत मार्गदर्शन करणे व प्रशिक्षण आयोजित करणे.<br>३) शेतमालावर प्रक्रिया करुन त्यांना बाजारपेठ उपलब्ध करुन देण्याबाबत मार्गदर्शन करणे .<br>४) कार्यक्रमाचे यशस्विततेकरिता विविध stakeholders सोबत समन्वय राखणे तसेच क्षमता बांधणी प्रशिक्षणे घेणे .<br>५) कार्यक्रमाची योग्य अंमलबजावणी व अपेक्षित परिणाम साध्य करण्याच्यादृष्टीने दौरे करणे .<br>६) जिल्हा समन्वयकांनी वेळोवेळी दिलेल्या जबाबदाऱ्या पार पाडणे . |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | युवा व्यावसायिक | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्य व्यवसाय विकास, पर्यटन, पर्यावरण इ. विषयातील पदव्युत्तर पदवी, एम.बी.ए., एम.एस.डव्ल्यु, तत्सम पदवी किंवा आय. टी. किंवा मास मिडीया, आय. टी. मधील पद्व्युत्तर, तत्सम पदवी. | १) जिल्हा व्यवस्थापन कक्षास कार्यक्रम अंमलबजावणीकरिता सहाय्य करणे.<br>२) कार्यक्रमाची प्रचार प्रसिध्दी करणे.<br>३) विविध प्रसारमाध्यमांमार्फत जनतेपर्यत कार्यक्रमाची फलनिष्पती पोहचविणे.<br>४) जिल्हयाअंतर्गत दौरे करणे.<br>५) जिल्हा समन्वयकांनी वेळोवेळी दिलेल्या जबाबदाऱ्या पार पाडणे. |
| ५ | कार्यालयीन सहायक | एच.एस.सी. व मराठी व इंग्रजी टंकलेखनाची विहित अर्हता. | १) कार्यक्रमाशी संबंधित पत्रव्यवहार टंकलिखित करणे.<br>२) कार्यक्रमाशी संबंधित सर्व कागदपत्रे सुस्थितीत जतन करणे.<br>३) जिल्हा व्यवस्थापन कक्षास कार्यक्रम अंमलबजावणीकरिता सहाय्य करणे. |